**महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना-महाराष्ट्र अंतर्गत प्रशासकीय व तांत्रिक मंजुरीचे अधिकार प्रदान करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.४७ /रोहयो-१०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३ ऑगस्ट,२०११

संदर्भ : १) शासन निर्णय नियोजन विभाग, क्रमांक :मग्रारोहयो-२००५/ प्र.क्र.१०४/ रोहयो-१०, दिनांक २३ डिसेंबर, २००५
२) शासन निर्णय नियोजन विभाग, क्रमांक :मग्रारोहयो-२००६/ प्र.क्र.१०४/ रोहयो-१०, दिनांक १९ ऑक्टोबर, २००६.
३) शासन निर्णय क्रमांक: मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.४७ /रोहयो-१० दि.८ जून,२०१०.
४) शासन परिपत्रक क्रमांक:मग्रारोहयो-२०१०/प्र.क्र.४७/रोहयो-१०,दि.२२ मार्च,२०११.

**प्रस्तावना -**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीत सुधारणा करणे, तसेच सदर योजना राज्यात प्रभावीपणे राबविणे, केंद्रिय निधीचा पर्याप्त वापर करणे, सध्याच्या व्यवस्थेतील दोष दूर करणे व आवश्यक असल्यास धोरणात्मक बदल करणे, त्याबाबत सूचना करण्याकरीता दिनांक २६ मार्च २०१० च्या आदेशान्वये मंत्रिमंडळाची उप समिती गठीत करण्यात आली होती.

२. सदर मंत्रिमंडळ उपसमितीने ज्या शिफारशी केल्या होत्या त्यावर निर्णय घेण्याकरिता मंत्रिमंडळाच्या विचारार्थ प्रस्ताव सादर करण्यात आला होता. दिनांक १२ मे, २०१० रोजी झालेल्या बैठकीमध्ये शासनाने महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामासाठी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देण्याच्या अधिकाराचे विकेंद्रीकरण करुन सदर अधिकार तालुका स्तरावर देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार संदर्भात नमूद केलेल्या ८ जून,२०१० च्या शासन निर्णयान्वये महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना अधिनियम २००५ अंतर्गत महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेंच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार तहसीलदार आणि गट विकास अधिकारी यांना देण्यात आले आहेत व ग्रामपंचायतीच्या कामांकरिता तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार पंचायत समितीच्या अभियंत्यास देण्यात आले आहेत. तसेच यंत्रणांच्या कामाकरिता तांत्रिक मान्यता देण्याचे पूर्ण अधिकार संबंधित खात्याचे तालुका पातळीवरील तांत्रिक

अधिका-यास (उदा. अभियंता) देण्यात आले आहेत. तांत्रिक मंजूरीच्या मान्यतेबाबत संबंधित तांत्रिक अधिका-यांना देण्यात आलेल्या अधिकाराबाबत खुलासा याआधी करण्यात आला आहे.

३. मात्र तांत्रिक मंजुरीच्या अधिकारांचे विकेंद्रीकरण करताना कामांच्या तांत्रिक मंजूरीकरिता आर्थिक मर्यादा दिलेल्या नाहीत. त्याचप्रमाणे तहसिलदार व गट विकास अधिकारी यांनाही प्रशासकीय मान्यतेबाबत आर्थिक मर्यादा दिलेल्या नाहीत. प्रशासकीय व तांत्रिक मंजुरीच्या आर्थिक मर्यादेबाबत क्षेत्रीय पातळीवरून मार्गदर्शन मागविले जात होते. या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मंजुरीबाबत वित्तीय मर्यादा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याकरिता आता पुढील शासन निर्णयाद्वारे आर्थिक मर्यादेबाबत शासन आदेश देत आहे.

**शासन निर्णय -**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत घेण्यात येणा-या सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मंजुरीचे अधिकार खालील प्रमाणे देण्यात येत आहेत.

| वित्तीय मर्यादा | कामे करणारी शासकीय यंत्रणा | प्रशासकीय मान्यता दंणारा अधिकारी | तांत्रिक मान्यता देणारा अधिकारी |
|---|---|---|---|
| रु. २५ लाखापर्यंतच्या कामांकरिता | पंचायत समिती/ग्रामपंचायत | गट विकास अधिकारी तथा सह कार्यक्रम अधिकारी | पंचायत समिती स्तरावरील तांत्रिक अधिकारी (अभियंता/तत्सम अधिकारी) |
| | इतर यंत्रणा ( line department) | तहसिलदार तथा कार्यक्रम अधिकारी | इतर यंत्रणेचे तालुका पातळीवरील तांत्रिक अधिकारी (अभियंता/तत्सम अधिकारी) |
| रु. २५ लाखांपेक्षा अधिक कामांकरिता | पंचायत समिती/ग्रामपंचायत | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक | जिल्हा परिषदेचा जिल्हापातळीवरील संबंधित विभागाचा तांत्रिक अधिकारी (अभियंता/तत्सम अधिकारी) |
| | इतर यंत्रणा ( line department) | जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक | इतर यंत्रणेचा जिल्हा पातळीवरील संबंधित विभागाचा तांत्रिक अधिकारी (अभियंता/तत्सम अधिकारी) |
| उपरोक्त वित्तीय मर्यादा या प्रत्येकी एका कामाकरिता आहेत. | | | |

उपरोक्त वित्तीय मर्यादा फक्त महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेकरिता लागू राहील.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २७१/११/व्यय-८, दिनांक २१ जुलै,२०११ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०७२१११११३१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-
(व्ही. गिरीराज )
प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण)

प्रति,

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
५) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक,
७) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव
८) विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, पुणे.
९) महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा)
१०) महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११) महालेखापाल २(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२) कक्ष अधिकारी, वित्त विभाग/व्यय-८, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
१३) प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४) आयुक्त, (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)
१६) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)
१७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८) सर्व विशेष कार्यकारी अधिकारी तथा उप विकास आयुक्त (रोंहयो).
१९) सर्व तहसिलदार.
२०) सर्व गट विकास अधिकारी.
२१) मुख्य अभियंता, ल.पा. (स्था.स्तर) पुणे
२२) संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३) समिती अधिकारी, कार्यासन ड-७, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
२४) सर्व उपसचिव, अवर सचिव,सहायक संचालक(लेखा),कक्ष अधिकारी, सांख्यिकीय अधिकारी (रोहयो प्रभाग)
२५) उप संचालक/रोहयो-९ यांजकडे संकेतस्थळावर अपलोड करण्याकरिता अग्रेषित.
२६) कक्ष अधिकारी, रोहयो-१, सारसंग्रहाकरिता
२७) निवडनस्ती, रोहयो-१०.

..................